मौ. गोलवाडे ता. रावेर जि. जळगाव या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २०१४/ प्र.क्र. १०७ / पा.पु.०९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २५ ऑगस्ट २०१४

वाचा:-

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो ११०९/१०४ अ/पा.पु.०७ दि.१७/३/२०१०**
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो १२१३/प्र.क्र.३५/पा.पु..०७ दि.१६ जुलै २०१३**
३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापाधो १२०८/प्र.क्र.५२/पा.पु.०७ दि.९ ऑक्टोबर २०१३**
४) **मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,जळगाव यांचे पत्र क्र.तांशा २/आरआर/३१८/२०१२ दि.२२/१०/२०१२**
५) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/ पापु-०७ दि.९ जुलै, २०१४**
६) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो १११४/प्र.क्र.२२/ पा.पु.०७ दि.९/७/२०१४**

**प्रस्तावना:-**

मौ. गोलवाडे ता. रावेर जि. जळगाव या गावात अस्तित्वातील पाणी पुरवठा योजनेचा उद्भव दुषित असल्याने तसेच योजनेमधून होणारा पाणी पुरवठा कमी असल्याने सदर गावासाठी नवीन योजना प्रस्तावित करण्यात आली आहे. सदर योजनेच्या अंदाजपत्रकास ग्रामपंचायत, गोलवाडे,ता. रावेर,ग्रामसभेने दि.१/५/२०१२ च्या ठरावाद्वारे प्रशासकीय मान्यता दिली असून, कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जिल्हा परिषद, जळगाव यांनी दि.७/९/२०१२ अन्वये तांत्रिक मान्यता दिली आहे. सदरहू योजनेचा दरडोई खर्च विहीत निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर योजनेस मान्यता देण्याचा प्रस्ताव जिल्हा परिषदेने शासनास सादर केला आहे. त्यानुसार वाढीव दरडोई खर्च असलेल्या सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय:-**

वरील बाब विचारात घेऊन मौ. गोलवाडे ता. रावेर जि. जळगाव नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च रु.३७१२.५७/- इतका असल्याने सदर पाणी पुरवठा योजनेच्या रु.४४,५५,१००/-

(रु.चवेचाळीस  लाख पंचावन्न हजार शंभर फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. मौ. गोलवाडे ता. रावेर जि. जळगाव पाणी पुरवठा योजनेसाठी संदर्भाधीन क्र. ६ येथील दि.९/७/२०१४ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार लोकवर्गणीची आकारणी  अनुज्ञेय रहाणार नाही.

३. सदर योजनेस खाली अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी. योजना पूर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झाली आहे याची खात्री ग्रामपंचायतीने करावी.

२. योजना पूर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल व दुरुस्ती ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करेल.

३. योजना चालविणे, योजनेची देखभाल व दुरुस्ती करणे याकरिता योणारा खर्च भागविण्यासाठी योग्य ती पाणीपट्टी ग्रामपंचायतीने निश्चित करावी. याकरिता शासनाकडून अनुदान देण्यात येणार नाही.

४. योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. तसेच योजनेमध्ये १००% घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करावा.

५. संपूर्ण गांव हगणदारीमुक्त करण्यात यावे.

६. योजना दरडोई खर्चाचे निकषामध्ये बसत नसल्याने योजनेचे काम मंजूर किंमतीतच पूर्ण करावे. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७. योजनेतील कामे टप्प्याटप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याखेरीज इतर कामे करु नयेत.

८. जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापूर्वी विभागाची परवानगी घ्यावी. विभागाच्या परवानगी शिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येऊ नयेत.

९. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामस्थांना सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरुवात करावी.

१०.सदर योजनेस तांत्रिक मान्यता दिलेल्या अटींची तसेच शासन निर्णय दि.१७/३/२०१० मधील अटींची पूर्तता करावी.

४. या योजनेवर होणारा खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदेस प्राप्त होणाऱ्या केंद्र व राज्य निधीमधून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, शासन निर्णय क्र. ग्रापाधो १२०८/प्र.क्र.५२/पा.पु.०७ दि.९ ऑक्टोबर २०१३ अन्वये प्रशासकीय विभागास देण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२५१६०११८१६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATIL DEELIP P

Digitally signed by PATIL DEELIP P
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=: Maharashtra, cn=PATIL DEELIP P
Date: 2014.08.25 15:58:03 +05'30'

**(दिलिप पां पाटील)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) जिल्हाधिकारी,. नाशिक
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,जळगाव
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे
६) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/ मुंबई .
७) अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, नाशिक
८) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना मंडळ, नाशिक
९) संचालक,भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगाव
११) सर्व विधानमंडळ सदस्य.
१२) मा. मंत्री (पा.पु. व स्व.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३) मा. राज्यमंत्री (पा.पु. व स्व.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
१६) कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१३,१७,१८ व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय